**भारतीय वन सेवेतील २०१५ बॅचच्या अधिकाऱ्यांकरीता कनिष्ठ समय श्रेणीत सहाय्यक वनसंरक्षकाची ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.......**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. आयएफएस-१२१७/प्र.क्र.११२/फ-७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २ मे, २०१७

**पहा**:- १. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष ९/भावसे/मेटा-४/प्र क्र १८(१६-१७)/०७/१६-१७, दिनांक १ एप्रिल, २०१७.
२. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१२/प्र.६६/१२/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ११ जुलै, २०१२.
३. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.७/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१६.

**शासन निर्णय:-**

भारतीय वन सेवेतील सन २०१५ च्या बॅचमधील महाराष्ट्र संवर्गाचे अधिकारी हे इंदिरा गांधी वन अकादमी, देहरादून येथील भारतीय वन सेवा अधिका-यांकरितांचे त्यांचे प्रशिक्षण पूर्ण करुन पुढील ४ महिन्यांच्या On the Job Training (OTG) करिता मे २०१७ च्या दुस-या आठवडयात देहरादून येथून कार्यमुक्त होऊन सरळ राज्य शासनाच्या सेवेत रुजू होणार आहेत. त्यांच्याकरिता कनिष्ठ समय श्रेणीत (वेतन श्रेणी Level १० in the Pay Matrix ) खालील प्रमाणे सहाय्यक वनसंरक्षकाची तीन अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत. सदर अधिसंख्य पदे दिनांक १ मे, २०१७ ते ३० एप्रिल, २०१९ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी अस्तित्वात राहतील.

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नाव | वनवृत्ताचे नाव | वन विभाग |
|---|---|---|---|
| १. | श्री. सिध्देश तुकाराम सावर्डेकर, भावसे | चंद्रपूर | मध्य चांदा |
| २. | श्री. जी. आर. माधवराज, भावसे | नागपूर | गोंदिया |
| ३ | श्री. अमित कुमार मिश्रा, भावसे | नागपूर | भंडारा |

उक्त अधिकाऱ्यांकरिता दिनांक १ मे, २०१७ ते ३० एप्रिल, २०१९ या दोन वर्षाच्या कालावधीकरिताचा सदर पदावरील वेतन व भत्त्यापोटी येणारा खर्च प्रधानशिर्ष "मुख्य लेखाशिर्ष २४०६- वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर), १०१ वनसंधारण व विकास, १०१ (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ०१-वेतन" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१२/ प्र.क्र.६६/१२/ वित्तीय सुधारणा-१, दि. ११ जुलै, २०१२ अन्वये व शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.७/वित्तीय

सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१६ प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५०३११०९५७६०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.05.03 16:38:54 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**

मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. संचालक, इंदिरा गांधी राष्ट्रीय वन अकादमी, देहरादून.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक, नागपूर/चंद्रपूर.
६. उपवनसंरक्षक, चंद्रपूर/गोंदिया/भंडारा.
७. कोषागार अधिकारी, चंद्रपूर/गोंदिया/भंडारा.
८. सहाय्यक संचालक, भावसे (लेखा) कक्ष, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. १.सिध्देश तुकाराम सावर्डेकर, २.श्री. जी. आर. माधवराज व श्री. अमित कुमार मिश्रा यांना द्वारा प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१०. निवड नस्ती, फ-७, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.